मुख्यमंत्री पशुस्वास्थ योजना..
पशुपालकांच्या दारापर्यंत पशुआरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी राज्यात फिरते पशुचिकित्सा पथक सुरु करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन शुध्दिपत्रक क्रमांक: पविआ-१०२४/प्र.क्र.१४१/पदुम-३,**
मंत्रालय विस्तार,मुंबई- ४०००३२
दिनांक : १३ जून, २०२५

**वाचा** :- १. शासन आदेश क्र.पविआ-१०१७/प्र.क्र.८७/पदुम-३, दि.२५.०२.२०१९
२. आयुक्त पशुसंवर्धन यांचे जा क्र. व्हि.एच. डी/ मो. व्हे. / सेनिपवैअ /२५८ /५११६/२०२४, पंस-१२, दिनांक २४.०४.२०२४.

**प्रस्तावना :-**

वाचा क्र. १ येथील दिनांक २५.०२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये मुख्यमंत्री पशुस्वास्थ योजनेंतर्गत पशुपालकांच्या दारापर्यंत पशुआरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी राज्यात फिरते पशुचिकित्सा पथक सुरु करण्यात आले आहे. सदर फिरते पशुचिकित्सा पथकांवर सेवानिवृत्त पशुवैद्यकीय अधिकाऱ्यांची मानधन तत्वावर नियुक्ती करण्यात येत आहे. तथापि, पुरेशा प्रमाणात सेवानिवृत्त पशुवैद्यकीय अधिकारी उपलब्ध होत नसल्यामुळे फिरते पशुचिकित्सा पथकांवर सेवानिवृत्त पशुवैद्यकीय अधिकाऱ्यांऐवजी बाहयस्त्रोताव्दारे नोंदणीकृत पशुवैद्यकांना नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार दिनांक २५.०२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयात खालील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे. :-

**शासन शुध्दिपत्रक :-**

उपरोक्त वाचा येथील शासन निर्णय दिनांक २५.०२.२०१९ निर्णयातील अ. क्र. ६ (१) मधील

*"सदर पशुचिकित्सा पथकांसाठी पशुवैद्यकीय अधिकारी/कर्मचारी उपलब्ध मनुष्यबळातून नियुक्त करण्यास तसेच उपलब्ध मनुष्यबळ कमी असल्यास, ठराविक कालावधसाठी सेवानिवृत्त पशुवैद्यकीय अधिकारी/कर्मचारी यांची प्रचलित धोरणानुसार मानधन तत्त्वावर नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे."*

या मजकुराऐवजी पुढील मजकुर समाविष्ठ करण्यात येत आहे. :-

*"सदर पशुचिकित्सा पथकांसाठी पशुवैद्यकीय अधिकारी/कर्मचारी उपलब्ध मनुष्यबळातून नियुक्त करण्यास तसेच उपलब्ध मनुष्यबळ कमी असल्यास, बाहयस्त्रोताव्दारे कंत्राटीतत्त्वावर नोंदणीकृत पदवीधर पशुवैद्यकांची प्रचलित धोरणानुसार मानधन तत्त्वावर नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे"*

सदर आदेश शासन कार्यनियमावली मधील भाग ३ अनुक्रमांक २९ (१) नुसार प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२५०६१३१६३६१९९७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2025.06.13 16:38:18 +05'30'

**(नि. भा. मराळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र ½ , मुंबई / नागपूर.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.
८. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त
९. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी (जिल्हा परिषद)
१०. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती-३